# बेल्वासाठी मतदान

## राष्ट्रपतीपदाच्या स्पर्धेत उतरलेल्या एका महिलेची सत्यकथा

लेखिका : सुदीप्ता बर्धन क्वालन
रेखाटनं: कोर्टनी ए. मार्टिन
अनुवाद: नीलांबरी जोशी



१८८४ मध्ये अमेरिकेत राष्ट्रीय निवडणुका व्हायच्या तेव्हा फक्त पुरुषांनाच मतदानाचा हक्क होता. हा कायदा अन्यायकारक आहे हे जाणून घेऊन बेल्वानं एक धाडसी पाऊल उचललं. ती राष्ट्रपतीपदाची निवडणूक लढली. त्याआधी असं धाडस करणा-या महिलांच्या तुलनेत तिला खूप मतंही मिळाली.

जेव्हा बेल्वा राष्ट्रपतीपदाच्या निवडणुकीत उभी राहिली तेव्हा स्त्रीपुरुषांना समान हक्क नव्हते. पण बेल्वा आयुष्यभर स्त्रियांच्या समान हक्कांसाठी लढली. हे करत असताना तिनं अनेक बंधनं तोडली.ती शिकायला कॉलेजमध्ये गेली. तिनं वकिलीचं शिक्षण घेतलं, अमेरिकेतल्या सर्वोच्च न्यायालयात अनेक खटल्यांची सुनावणी केली, इतकंच नव्हे तर वॉशिंग्टन डीसीमधल्या रस्त्यांवर तीनचाकी सायकलही चालवली.

राष्ट्रपतीपदाची निवडणूक लढत असताना तिला अनेक संकटांचा सामना करावा लागला. महिलांना समान हक्क मिळावेत या मागणीत तिनं कधीच माघार घेतलौ नाही. याच कारणामुळे त्या काळातही तिला लोकांचा आदर आणि मतं मिळाली.

बेल्वाची कथा फार लोकांना ठाऊक नाही, पण ती कहाणी आजही वाचकाला प्रेरणा देते. बेल्वाच्या काळापासून आत्तापर्यंत अनेक बदल झाले असले तरी कित्येक गोष्टींसाठी आजही संघर्ष चालूच ठेवायला हवा आहे, बेल्वानं तोच मार्ग वाचकांना दाखवून दिला आहे.

# बेल्वासाठी मतदान

## राष्ट्रपतीपदाच्या स्पर्धेत उतरलेल्या एका महिलेची सत्यकथा

लेखिका : सुदीप्ता बर्धन क्वालन

रेखाटनं: कोर्टनी ए. मार्टिन

अनुवाद: नीलांबरी जोशी



बेल्वा जेव्हा दहा वर्षांची होती, तेव्हा तिनं एका ठिकाणी वाचलं, “माणसाचं आयुष्याचं प्रयोजन ठरलेलं असेल तर तो माणूस पर्वतही हलवू शकतो.” लहानग्या बेल्वानं ही म्हण शब्दश: प्रत्यक्षात आणायचं ठरवलं.

तिनं पर्वत हलवायचा प्रयत्न वगैरे केला नसेल – ती तेव्हा लहानच होती. तेव्हा तिच्यासाठी छोटासा डोंगरच ठीक होता. तिनं आपल्या घराबाहेरचा एक छोटी टेकडी शोधली. ती हलवण्यावर तिनं सगळं लक्ष केंद्रित केलं. आपला हेतू पक्का आहे यावर तिचा पूर्ण विश्वास होता. टेकडी हलली नसली म्हणून काय झालं. मात्र तिनं खूप प्रयत्न करुनही टेकडी तसूभरही हलली नाही.

मात्र डोंगल हलवायचे प्रयत्न बेल्वानं आयुष्यभर सोडले नाहीत.



बेल्वाचा जन्म १८३० मध्ये न्यूयॉर्कमधल्या नायगारा काऊंटीतल्या एका शेतावर झाला. तिच्या आईवडिलांच्या पाच मुलांमधली ती दुसरी मुलगी. ती स्वत:ला गावाकडच्या गरीब शेतक-याची मुलगी म्हणवून घेत असे. पण सर्वसामान्य घरातल्या परिस्थितीनं बेल्वाला मोठी स्वप्नं पहायला आणि ती पुरी करायला रोखलं नाही.

टेकडी हलवण्याच्या बालपणातल्या घटनेनंतर, लग्न आणि मूल झाल्यावर विधवा झाल्यानंतर, कॉलेजमध्ये शिक्षण घेतल्यानंतर, शिक्षिकेची नोकरी केल्यानंतर, स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळावा यासाठी गट तयार केल्यानंतर, बेल्वानं वकील व्हायचं ठरवलं. तेव्हा ती एकोणचाळीस वर्षांची होती. बेल्वा स्मार्ट, तडफदार होती आणि कठोर परिश्रम करण्याची तिची तयारी होती. पण कोणतंच विधी महाविद्यालय तिला प्रवेश द्यायला तयार नव्हतं ही समस्या होती.
एका महाविद्यालयानं तिला लिहिलं होतं,

मिसेस बेल्वा लॉकवूड,
मॅडम, कोलंबिया कॉलेजच्या शिक्षकांनी या संस्थेतल्या विधी विभागात तुम्हाला प्रवेश मिळावा या याचिकेवर विचार केला आहे. अंतर्गत सल्लामसलतीनंतर शिक्षकांनी असा निर्णय घेतला आहे की, असं करणं उचित ठरणार नाही. यामुळे तरुण विद्यार्थ्यांचं लक्ष विचलित होऊ शकतं.

बाकी दोन विधी महाविद्यालयांनी तर तिला उत्तर द्यायची तसदीदेखील घेतली नाही. बेल्वाची स्वप्नं पुरी होण्याच्या आड समोर एक संकटांचा पर्वत उभा होता.

बेल्वानं आपला मार्ग रोखणा-या त्या पर्वताला हलवायचं काम सुरु केलं. यावेळी ती हरणार नव्हती.



बेल्वाला नव्यानं स्थापन झालेल्या नॅशनल विद्यापीठातल्या विधी विभागाबद्दल कळलं. या विद्यापीठाचे संचालक आपल्या विधी विभागात पुरुषांबरोबर स्त्रियांनाही प्रवेश देणार आहेत असं बेल्वाला कळलं. बेल्वानं तिथे प्रवेशअर्ज पाठवला. त्यांनी बेल्वा आणि इतर चौदा स्त्रियांना वकिलीचं शिक्षण घ्यायला प्रवेश दिला.

मात्र महाविद्यालयात स्त्रियांसाठी काही पायघड्या घातलेल्या नव्हत्या. एकाच वर्गात पुरुषांबरोबर बसून शिकण्याची किंवा परीक्षा देण्याची स्त्रियांना परवानगी नव्हती.  पुरुषांना देखील आपल्या वर्गात बसून स्त्रियांनी शिकणं नकोच होतं, आणि ते असं बेधडकपणे सांगतही होते. वर्गातल्या पुरुषांनी वरिष्ठांबरोबर तक्रारही केली, की ते स्त्रियांबरोबर एकाच वर्गात शिकणार नाहीत. थोड्याच दिवसात बारा स्त्रिया महाविद्यालय सोडून निघून गेल्या. शिकायचा धाक आणि पुरुष सहका-यांचा दुस्वास त्यांना सहन झाला नाही.

ज्या दोन स्त्रियांनी शिक्षण पूर्ण केलं त्यातली एक बेल्वा होती. खूप कष्ट करुन आणि पुरुषांसारखाच अभ्यास करुनही महाविद्यालयानं त्यांना डिप्लोमा पूर्ण केल्याचं प्रमाणपत्रक दिलं नाही.





पण बेल्वा अशी हार थोडीच मानणार होती?

३ सप्टेंबर १८७३ मध्ये तिनं युनायटेड स्टेटस ऑफ अमेरिकाचे राष्ट्राध्यक्ष युलिसिस एस ग्रँट यांना जे नॅशनल युनिव्हर्सिटी लॉ स्कूलचेही अध्यक्ष होते, त्यांना तिनं एक पत्र लिहिलं.
प्रति : युएसए ग्रँट, युनायटेड स्टेट ऑफ अमेरिका,
महोदय,

आपण नॅशनल युनिव्हर्सिटी लॉ स्कूलचे अध्यक्ष आहात, आहात ना? जर आपण या संस्थेचे अध्यक्ष असाल तर मला तुम्हाला जे सांगायचं आहे की मी कायद्याचा शिक्षणक्रम पूर्ण केला आहे आणि डिप्लोमा मिळणं हा माझा हक्क आहे, मी तशी तुमच्याकडे मागणी करते आहे. जर तुम्ही या संस्थेचे अध्यक्ष नसाल तर, तुम्ही या कागदावरुन तुमचं नाव काढून टाका आणि जे तुम्ही नाही ते जगासमोर दाखवणं बंद करा असा माझा दावा आहे.

नम्र,
बेल्वा लॉकवूड

पत्र लिहिल्यानंतर थोड्या दिवसांनी बेल्वाला तिचा डिप्लोमा मिळाका. इतकंच नव्हे तर त्यावर खुद्द राष्ट्रपतींची स्वाक्षरी होती. आता ती वकील झाली होती.

तिनं आपल्या वाटेतला दुर्गम पहाड हलवला होता आणि एक महत्वाचा धडाही ती शिकली होती. तो धडा तिच्याच शब्दांत :

“इच्छा, संकल्प आणि अविरत परिश्रम यामुळे मी प्रत्येक ध्येय साध्य करु शकत होते, जे मला साध्य करायचं होतं. तिला हेदेखील ठाऊक होतं, की ती स्वत:वर विश्वास ठेवणं, स्वत:च्या भल्याचा विचार करणं कधीच थांबवणार नाही आणि कधीच हिंमत हरणार नाही.”



बेल्वानं आपण काय करु शकतो ते जगाला वारंवार दाखवून दिलं. आणि तिनं जे काही केलं, त्या पावलावर पाऊल ठेवून अनेकजणांनी तो मार्ग आक्रमला. नॅशनल युनिव्हर्सिटी लॉ स्कूल मध्ये विद्यार्थी असलेली ती पहिली स्त्री होती. ती फेडरल न्यायालयात वकिली करणारी पहिली स्त्री ठरली आणि अमेरिकेच्या सर्वोच्च न्यायालयासमोर खटले चालवणारीही

पहिली स्त्री ठरली. तिला हा अधिकार मिळाल्यानंतर वर्षभरातच तिनं सॅम्युएल आर लोअरी या कृष्णवर्णीय वकिलाला तोच विशेष अधिकार मिळवून द्यायला मदत केली. स्वत:ला समान हक्क मिळायला हवेत या विचाराइतकाच लोअरीला समान हक्क मिळायला हवेत यावर तिचा विश्वास होता.

बेल्वा सरकारवर दबाव आणण्या-यांपैकी एक सन्माननीय सदस्य होती, तिच्याकडे उत्कृष्ट वक्तृत्व होतं आणि स्त्रियांच्या अधिकाराबद्दल जागरुक कार्यकर्ती होती. वॉशिंग्टन डी सी मध्ये तीनचाकी सायकल चालवणारी ती पहिली स्त्री होती आणि ती ताशी दहा मैल या वेगानं ती सायकल चालवत असेल. बेल्वाच्या या सायकल चालवण्यानं प्रेरित होऊन दोन तीन वर्षात इतक्या स्त्रियांनी सायकल चालवणं सुरु केलं की न्यूयॉर्क टाईम्सनं बातमी छापली – "या तीनचाकी सायकलवरच्या स्त्रिया घोड्यावर स्वार असलेल्या स्त्रियांपेक्षा जास्त प्रमाणात लक्ष वेधून घेतात".

१८८४ मध्ये वयाच्या चोपन्नाव्या वर्षी बेल्वानं परत एकदा बाजी मारली. यावेळी अमेरिकेत राष्ट्रपतीपदाची निवडणूक लढणारी ती पहिली स्त्री ठरली.

त्या काळात स्त्रियांना मतदानाचा हक्क नव्हता. तो हक्क स्त्रियांना मिळावा यासाठी बेल्वा अनेक वर्षं लढत होती. १८८० आणि १८८४ मध्ये ती रिपब्लिकन पार्टीच्या दोन अधिवेशनांना हजर राहिली. दोन्ही वेळेला तिला स्त्रियांना मतदानाचं हक्क मिळावा याचं विधेयक मंजूर होईल अशी आशा होती. पण दोन्ही वेळेला तिच्याकडे दुर्लक्ष केलं गेलं.

बेल्वा या प्रकारानं बरीच निराश झाली आणि तिनं वुमेन्स हेरॉल्ड आॅफ इंडस्ट्रीला लिहिलं – “स्त्रियांना महत्वाचा पदांसाठी नामांकन का देऊ नये? आपली स्वत:ची पार्टी, आपला स्वत:चा आवाज उठवणारं व्यासपीठ आणि आपला नामांकन असलेला उमेदवार असण्याची वेळ आली आहे. आपण स्त्रियांनी स्वत:च मिळवल्याशिवाय आपल्याला समान हक्क मिळणार नाहीत, आपण स्वत:च स्वत:चा आदर केल्याशिवाय इतरांकडून आदर मिळणार नाही.”

बेल्वाला हे जाणवलं की स्त्रिया आपलं मत देऊन निवडणुकी प्रक्रियेत सामील होऊ शकत नाहीत, पण स्त्रियांना निवडणूक लढवायला अडथळा आणणारा कायदा अस्तित्वात नाही. “मी मत देऊ शकत नाही”, तिनं विचार केला, “पण माझ्यासाठी मतं दिली जाऊ शकतात.”

मग बेल्वानं तेच करण्याचा निर्धार केला.



१८८४च्या ऑगस्ट महिन्यात बेल्वानं इक्वल राईटस पार्टी ऑफ द युनायटेड स्टेटस यांच्याकडून एक पत्र आलं, त्यात लिहिलं होतं :
मॅडम,

महिला समान अधिकार या विषयावरच्या राष्ट्रीय अधिवेशनाद्वारे, आपल्याला राष्ट्रपती पदासाठी नामांकन देण्याचा बहुमान आम्हाला लाभला हे कळवताना आम्हाला आनंद होतो आहे.

बेल्वाला या पत्रामुळे खूप आश्चर्य वाटलं आणि शंकेनं तिनं सुरुवातीला ही वार्ता गुप्त ठेवली. पण ३ सप्टेंबरला नामांकन स्वीकारल्याचं उत्तर पत्राद्वारे कळवलं. इथून तिची निवडणूक मोहीम सुरु झाली.







बेल्वानं मॅरिएट स्टो हिची निवडणुकीत साथीदार म्हणजे उपराष्ट्रपतीपदाची उमेदवार म्हणून निवड केली. डेमोक्रॅटिक पार्टीचे क्लीव्हलँड आणि रिपब्लिकन पार्टीचे जेम्स ब्लेन हे तिच्याविरोधी लढणारे प्रमुख नेते होते. निवडणुकीचा प्रचार दौरा अवघड होता हे बेल्वाला माहिती होतं. राष्ट्रपतीपदासाठी उभं रहाणं खर्चिकही होतं. प्रचारासाठी देशभर दौरे करायला लागणार होते आणि सगळा वेळ त्याच्यातच जाणार होता. हे सगळं करणं सोपं नव्हतं, विशेषत: कोणत्याच राजकीय गटाच्या आर्थिक मदतीशिवाय. १८७२ मध्ये व्हिक्टोरिया वुडहिल या स्त्रीनं राष्ट्रपतीपदाच्या शर्यतीत उमेदवार असल्याचं जाहीर केलं होतं. पण तिला आपली मोहीम निवडणुकीच्या खूप आधी मागे घ्यावी लागली, कारण मोहीम चालवायला तिच्याकडे आर्थिक पाठबळच नव्हतं.

तेव्हा सगळ्या उमेदवारांचं नाव छापलेली मतपत्रिका सरकारकडून निघत नव्हती. प्रत्येक राजकीय पक्षाला आपली मतपत्रिका छापून वाटायला लागायची. याचा अर्थ असा होता की ज्या उमेदवाराकडे मतपत्रिका छापायला पैसे नसतील, त्याला मतंच मिळणार नाहीत.

बेल्वानं त्यापूर्वी राष्ट्रपतीपदाच्या निवडणुक मोहीमेत काम केलेलं होतं, त्यामुळे आपल्याला काय काय करायचं आहे ते तिला ठाऊक होतं. तिनं मोहीमेसाठी पैसे जमवायचे प्रयत्न केले. त्यासाठी तिनं देशभर दौरे काढून ठिकठिकाणी भाषणं केली. आपल्या समर्थकांना मतपत्रिका छापायला तिनं आवाहन केलं.

आपली मोहीम उत्साहपूर्ण होईल हे बेल्वाला माहिती होतं – त्याचवेळी व्हाईट हाऊस (राष्ट्रपती भवन) आणि ती यांच्यामध्ये एक भव्य पहाड उभा आहे याचीही तिला जाणीव होती.

पण असे पहाड बेल्वा लॉकवूडला अडवू शकत नव्हते हेही तुमच्या लक्षात आलंच असेल.






वर्तमानपत्रांनी “त्या मोहीमेतलं सर्वात हास्यास्पद ध्यान” असं तिला म्हणल्यानंतरही बेल्वा मागे सरली नाही. पुरुष समीक्षकांनी स्त्रियांचा पोशाख परिधान करुन बेल्वा लॉकवूडची नक्कल करणारा “बेल्वा लॉकवूड मोर्चा” काढला तरीही ती मागे हटली नाही.

ज्या ठिकाणांहून विरोध होईल याची सुतराम कल्पना नव्हती अशा ठिकाणांहून विरोध झाला तेव्हाही ती मागे सरली नाही. तिनं आपल्या आयुष्यातला सर्वाधिक वेळ स्त्रियांना त्यांचे हक्क मिळवून द्यायला व्यतीत केला होता – खरं तर राष्ट्रपतीपदाची निवडणूकही ती यासाठी लढत होती की स्त्रियांना मतदानाचा अधिकार मिळायला हवा हे लोकांना पटवून देता यावं. असं असूनही कित्येक स्त्रियांनीच तिच्या राष्ट्रपतीपदाची निवडणूक लढवण्यालाच विरोध केला. पुरुषांच्या जगात ही घुसखोरी करणं हा वेडेपणा आहे असंही कित्येक स्त्रियांना वाटत होतं. ज्या महिलांच्या हक्काबाबत बेल्वाइतक्याच जागरुक होत्या, त्यातल्या काहीजणींनाही “बेल्वा महिलांचे हक्क या प्रकरणाचा विपर्यास करुन ते चेष्टेचा विषय बनवते आहे” असं वाटत होतं. “नॅशनल वुमन सफरेज असोसिएशन” ही अमेरिकेतली महिलांच्या अधिकाराबाबतची सर्वात मोठी संघटना होती, त्यांनीही बेल्वाला पाठिंबा नाकारला. ॲबिगेल डनवे ही सफरेजमधली एका अधिकारी महिला म्हणाली, “बेल्वानं जे नुकसान केलं आहे, त्याचा अंदाज लावणंही कठीण आहे.”

पण बेल्वा हिंमत हारली नाही. आपण जे काम करतो आहे त्याची किती गरज आहे ते तिला माहिती होतं. बाकी काही साध्य झालं नाही तरी  - तिचं म्हणणं लोक ऐकत होते, ज्यातले विचार तिला महत्वाचे वाटत होते. त्यामुळे ती देशभर दौरे करत राहिली, वेगवेगळ्या विषयांवर भाषणं देत राहिली. “सर्व अमेरिकन लोकांना, त्यांचा वंश किंवा लिंग काहीही असो, समान हक्क मिळायला हवेत” -  हे ती वारंवार सांगत राहिली.

आणि लोक देखील तिचं ऐकत होते. खरं तर कितीतरी लोकांना तिचं म्हणणं समजत होतं. वॉशिंग्टन इव्हिनिंग स्टारच्या एका अंकात अखेरीस हे छापून आलं, “इतकं तर स्पष्ट दिसतं आहे की मिसेस लॉकवूड निवडून आल्या तर, त्यांच्या शासनातलं काम समजूतदार लोकांच्या पसंतीला उतरेल.”



प्रत्यक्ष निवडणुकीच्या दिवशी बेल्वाला काहीच खास काम नव्हतं. मतदान केंद्रावर जाऊन स्वत:साठी तिला मतदानही करता येत नव्हतं. मग ती वॉशिंग्टन डी सी मधल्या आपल्या घरात वाट पहात बसली होती. तिची मुलाखत घ्यायला आलेल्या प्रत्येक पत्रकाराचं तिनं स्वागत केलं.

बेल्वा आणि देशवासीयांना ग्रोव्हर क्लीव्हलँड यांनी निवडणूक जिंकल्याचं कळलं. पण बेल्वालाही मतं मिळाली होती. मात्र तिला कमी मतं मिळाली होती. तिला ४७११ मतं मिळाली होती. त्यावेळी अमेरिकेत अडोतीस राज्यं होती, त्यापैकी नऊ राज्यांमधल्या लोकांनी बेल्वाला मतं दिली होती.

ही केवळ मोजली गेलेली मतं होती. तिला अजून मतं मिळाली होती, विशेषत: पेनसिल्व्हेनिया राज्यात, मात्र ती मतं फेकून दिली होती, कारण मतं मोजणा-या लोकांच एका स्त्रीला मतं मिळतात यावर विश्वासच बसला नव्हता.

आपल्याला हवं ते आपण मिळवलं आहे हे जेव्हा बेल्वाच्या लक्षात आलं, तेव्हाच काही मतपत्रिका फेकून दिल्याचं तिला कळलं. तसंच तिला मिळालेली मतं दुस-याच उमेदवारांना दिली गेली. न्यूयॉर्क राज्यात तिला मिळालेली १३३६ मतं ग्रोव्हर क्लीव्हलँडच्या मतांमध्ये धरली होती. क्लीव्हलँड केवळ ११४९ मतांनी जिंकले होते. आपली मतं चुकीच्या पध्दतीनं मोजली गेली नसती तर काय झालं असतं असा विचार बेल्वानं करणं हे ग्राह्यच होतं.

१८८५ च्या जानेवारीत बेल्वानं काँग्रेसला एक निवेदन पाठवलं, ज्यात तिनं नमूद केलं होतं की, “निवडणुकांमधल्या मतदानपत्रिकांवर आयोगाचं नियंत्रण नाही, मतदान केंद्रांवरही सरकार लक्ष ठेवत नाही, त्यामुळे लोक बनावट मतपत्रिका पेट्यांमध्ये टाकू शकतात किंवा योग्य त्या मतपत्रिका फेकून देऊ शकतात.”

पण याचा काहीच परिणाम झाला नाही. मतंमोजणीची प्रक्रिया काँग्रेसनं बदलली नाही.

आपल्याला उमेदवार म्हणून काँग्रेसनं स्वीकारलं नसलं तरी त्या काळात जितका हलवला जाऊ शकत होता, त्या प्रमाणात आपण एक पर्वत हलवला आहे इतकं बेल्वाला ठाऊक होतं. राष्ट्रपतीपदाची निवडणूक लढवणारी ती पहिली स्त्री ठरली, जिला मतंही मिळाली होती. आणि त्या काळात फक्त पुरुषच मतदान करु शकत होते, त्यामुळे ही मतं नि:संशयपणे पुरुषांचीच होती. अमेरिकन जनता एका महिला राष्ट्रपतीची कल्पना करायला तयार आहे हे सिध्द करणारी ती पहिली स्त्री ठरली.

योग्य वेळ येताच पर्वत आपल्या जागेवरुन पूर्णपणे हलेल यावर तिचा विश्वास होता. बेल्वानं एक मोठा हादरा तर दिलाच होता.

पर्वत त्याच्या जागेवरुन हलवायला इच्छाशक्ती, संकल्प आणि कठोर परिश्रम यांची गरज होती. त्याबरोबरच एक स्त्री काय करु शकते हे बेल्वाला जगाला दाखवून द्यायचं होतं.



## लेखिकेचं मनोगत

बेल्वाच्या धारणा पक्क्या होत्या आणि ती अपयशाला घाबरत नव्हती. याच कारणामुळे नवीन गोष्टी करण्याचं धाडस ती करु शकली. आयुष्यभर तिनं नवनवीन अडथळे पार केले, तोडले. उदाहरणार्थ, वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षी तिनं चीरोकी गटाच्या लोकांबद्दलच्या एका खटल्याचं सर्वोच्च न्यायालयात प्रतिनिधित्व केलं. "चीरोकी नेशन" विरुध्द "युनायटेड स्टेटस" असा तो खटला होता. युनायटेड स्टेटसच्या सरकारनं उत्तर कॅरोलिना, जॉर्जिया आणि टेनेसी राज्यातल्या या मूळ चीरोकी रहिवाशांच्या जमिनी हिरावून घेतल्या होत्या. चीरोकी लोकांना त्यांच्या जमिनींबद्दल सरकारी तिजोरीतून नुकसानभरपाईची कोणतीच रक्कम दिली नव्हती. बेल्वानं हा खटला जिंकला आणि चीरोकी समूहाला ५० लाख डॉलर्सची नुकसानभरपाई मिळवून दिली – आजच्या जगातही ही रक्कम मोठी आहे.

१८८४ मधल्या राष्ट्रपतीपदाच्या निडणुकीत अनेक लोकांनी बेल्वाला मत दिलं होतं. तिला नक्की किती मतं मिळाली याचे वेगवेगळे आकडे समोर येतात – साधारण ४१४९ ते ४७११ असा नागरिकांच्या मताचा आकडा आहे. पण मतं मोजणा-या अधिका-यांनी आपण बेल्वाला मतं मिळालेल्या कित्येक मतपत्रिका फेकून दिल्याचं मान्य केलं आहे. त्यामुळे बेल्वाच्या मतांच्या आकड्यात भर पडू शकते.

खरं तर अमेरिकेतल्या राष्ट्रपतीपदाच्या निवडणुकीतल्या परिणामांवर राष्ट्रपती निवडला जात नाही. प्रत्येक राज्यात निर्णायक अशी निवडणुकांमधून मतं येतात. जनतेच्या मतांवर आधारित अशी निर्णायक मतं उमेदवारांना दिली जातात. पण जनतेनं दिलेल्या मतांवरच राष्ट्रपतीला निर्णायक मतं मिळावीत असा तिथे कोणताच कायदा नाही.

१८८४ मध्ये इंडियानाच्या इलेक्टोरल मतदारांनी, इंडियानाच्या नागरिकांच्या मतांनुसार जिंकलेल्या ग्रोव्हर क्लीव्हलँडला, आपण इलेक्टोरल मतं देणार नाही असं बेल्वासमोर सूचित केलं होतं. खरं तर तोपर्यंत कोणतीच स्त्री इलेक्टोरल मतदानपध्दतीत राष्ट्रपतीपदाची निवडणूक जिंकली नव्हती. इंडियानापोलिसच्या "डेली सेंटिनेल"मध्ये "इंडियानाच्या इलेक्टोरल मतदारांनी बेल्वाला मतं देणं हा एक विनोद होता" असं छापून आलं होतं. पण ऐतिहासिक कागदपत्रांनुसार बेल्वाला हा विनोद वाटला नव्हता. राष्ट्रपतीपदाच्या निवडणुकांनंतर प्रत्येक राज्यात इलेक्टोरल मतं मोजून राष्ट्रपती ठरवला जातो. कॉंग्रेसनं इंडियानची इलेक्टोरल मतं बेल्वाला न देता ग्रोव्हर क्लीव्हलँडला द्यायचं ठरवलं. बेल्वानं इंडियानाच्या इलेक्टोरल मतदारांच्या सांगण्यावरुन याला विरोध केला. तिनं कॉंग्रेसला लिहिलेल्या निवेदनात, इंडियानाला तिच्या बाजूनं मत द्यायचा निर्विवाद अधिकार आहे असं नमूद केलं होतं.

पण कॉंग्रेसच्या सदस्यांनी बेल्वाच्या या निवेदनानंतरही आपला निर्णय बदलला नाही. मात्र तिचा हा दावा हास्यास्पदही मानला गेला नाही. बेल्वाचं निवेदन कॉंग्रेसनं महिला मताधिकार समितीकडे पाठवलं आणि कॉंग्रेसच्या ऐतिहासिक रेकॉर्डसमधलं ते एक महत्वाचं कागदपत्र बनलं.

निवडणूक निकाल काहीही असले तरी बेल्वाच्या आयुष्यात तिला राष्ट्रपतीपदासाठी नामांकन मिळणं हा महत्वाचा क्षण होता. तुनं १८८४ मध्ये आणि नंतर १८८८ मध्ये दुस-यांदा निवडणूक लढवली. पण बेल्वा राष्ट्रपतीपदासाठी निवडणूक लढवणारी पहिली स्त्री होती का? या प्रश्नाचं उत्तर तुम्ही परिस्थितीकडे कोणत्या दृष्टिकोनातून पहाता त्यावर अवंलबून आहे.

१८७२ मध्ये इक्कल राईटस पार्टीनं व्हिक्टोरिया वुडहिल नावाच्या स्त्रीला राष्ट्रपतीपदासाठी नामांकन दिलं होतं. तिला मतं मिळाली का नाही याबाबत इतिहासकारांमध्ये मतभेद आहेत. शासनाकडच्या कागदपत्रांमध्ये वुडहिलच्या नावानं मत दिसत नाही. त्याचबरोबर वुडहिलचं नाव मतदानपत्रिकेवर होतं का नाही याबाबतही वाद आहेत.

पण बेल्वा लॉकवूडचा विचार केला तर तिला मतं मिळाली होती हे नि:संशय आहे. बेल्वाला जनतेकडून मतं मिळाली होती आणि इलेक्टोरल मतंही मिळाली होती, ज्याचं रेकॉर्ड उपलब्ध आहे. याच कारणांमुळे ती राष्ट्रपतीपदाच्या निवडूणकीत मतं मिळवणारी पहिली अमेरिकन स्त्री ठरते.

बेल्वाच्या राष्ट्रपतीपदाच्या निवडणुकीबाबत पहिल्यांदा हा शब्द अजून एक गोष्टीसाठी जोडला गेला आहे हे रंजक आहे. ती राष्ट्रपतीपदाची पहिली उमेदवार होती जिनं उपराष्ट्रपतीपदासाठी पहिल्यांदा स्त्री सहकारी निवपली. १९८४ मध्ये वॉल्टर मॉंडेल या डेमोक्रॅटिक पार्टीच्या उमेदवाराबरोबर गॅराल्डिन फेरारो ही महिला उपराष्ट्रपतीपदासाठी निवडणूक लढवत होती. यासाठी तिला उपराष्ट्रपतीपदासाठी निवडणूक लढवणारी पहिली स्त्री मानलं जातं. पण खरं तर फेरारो एका प्रमुख राजकीय पक्षाची पहिली स्त्री उमेदवार नक्कीच असली तरी मॅरिएट स्टो, जी बेल्वासोबत उपराष्ट्रपतीपदासाठी

निवडणूक लढवत होती, ती पहिली स्त्री उमेदवार होती.
बेल्वानं आयुष्यभर स्त्रियांना समान अधिकारांसाठी लढायला प्रोत्साहन दिलं. स्त्रीपुरुषांच्या समान अधिकारांवर तिचा दृढ विश्वास होता. युनायटेड स्टेटस ऑफ अमेरिका कधी ना कधी आपल्या सर्व नागरिकांना समान सुरक्षा देईल याबद्दल तिला खात्री होती.

आणि ते खरंच होतं.!

।